कक्ष अधिकारी या पदावरून अवर सचिव
या पदावर तात्पुरती पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः असप-१२२२/प्र.क्र.११०/का.१४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-१० ऑगस्ट, २०२३.

**आदेश**

मंत्रालयीन विभागातील खाली नमूद कक्ष अधिकारी [गट-ब (राजपत्रित) वेतनश्रेणी S-१७: रु.४७६००-१५११००)] यांना अवर सचिव [गट-अ (राजपत्रित) वेतनश्रेणी S-२३: रु.६७७००-२०८७००)] या पदावर या आदेशाद्वारे विहित अटींच्या अधिनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कक्ष अधिकाऱ्यांचे नाव | जात प्रवर्ग | सध्याचा विभाग | अवर सचिव पदावरील पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.सुनिल जैराम तुमराम | अज | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६-ब यांच्या शासन निर्णय दि.०७.०५.२०२१ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात येत आहेत.

३. श्री.सुनिल जैराम तुमराम यांची अवर सचिव पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.-

(अ) सदरची पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

(आ) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकारी यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(इ) सदर तात्पुरती पदोन्नती प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले अधिकारी रुजू होईपर्यंत किंवा पदोन्नतीच्या आदेशापासून ११ महिन्यासाठी यांपैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी असेल.

(ई) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांची तात्पुरती पदोन्नती संपुष्टात येईल.

(उ) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी अवर सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांला पदावनत करण्याच्या अधीन राहून सदर तात्पुरत्या पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

(ऊ) सदर पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७, कक्ष अधिकारी संवर्गांच्या ज्येष्ठतेबाबत मा.उच्च न्यायालयाने पारीत केलेल्या दि.६.८.२०१८ रोजीच्या आदेशाबाबत मा.सर्वोच्च न्यायालयात असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका

क्र.२५१८१/२०१८ व त्यातील आय.ए. क्र.२५९०/२०१९ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(ए) सदर तात्पुरती पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील प्रलंबित असलेल्या रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७८/२०२१ यामधील आय.ए.(स्टॅम्प) क्र. १०९१०/२०२१ व १०९११/२०२१ तसेच रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०९०९/२०२१ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

४. श्री.सुनिल जैराम तुमराम यांनी अवर सचिव पदावरील तात्पुरती पदोन्नती ही त्यांच्याविरुध्द प्रस्तुत आदेशांच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित विभागाने खातरजमा करुन श्री.सुनिल जैराम तुमराम यांच्याविरुध्द विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु वा प्रस्तावित असल्यास या विभागास अवगत करावे.

५. श्री.सुनिल जैराम तुमराम यांना अवर सचिव या पदावर तात्पुरती पदोन्नतीचे आदेश निघाल्याच्या तारखेपासून ३० दिवसामध्ये अवर सचिव पदावर रुजू होणे आवश्यक आहे. याबाबत श्री.तुमराम यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का-१२, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीकडे वेधण्यात येत आहे..

६. महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणातील तरतूदीनुसार श्री.सुनिल जैराम तुमराम यांना पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण घेणे बंधनकारक राहील अन्यथा त्यांना कक्ष अधिकारी पदावर पदावनत करण्यात येईल.

७. श्री.सुनिल जैराम तुमराम यांना सामान्य प्रशासन विभागाने अवर सचिव पदावर रूजू करून घेऊन त्याबाबतच्या आदेशाची प्रत या विभागास तात्काळ अवगत करावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०८१०१६१७५०५५०७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.08.10 16:19:26 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२.मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स./ प्रधान सचिव
३.अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४.सह/उप सचिव (आस्थापना) - सामान्य प्रशासन विभाग मंत्रालयीन विभाग
५.श्री.सुनिल जैराम तुमराम, कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती- कार्या-१४